वडसा-देसाईगंज-गडचिरोली या नवीन रेल्वे मार्गाकरीता रु.१९.२२ कोटी निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र.आरएलवाय-११०९/प्र.क्र.२४५/परिवहन-५**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- २७ जानेवारी, २०२२

वाचा : १) गृह विभाग, शासन निर्णय क्र. आरएलवाय-११०९/प्र.क्र.२४५/परिवहन-५, दिनांक ११ फेब्रुवारी, २०१०.
२) गृह विभाग, शासन निर्णय क्र. आरएलवाय-२०१४/प्र.क्र.८५/परिवहन-१, दिनांक ५ फेब्रुवारी, २०१५
३) गृह विभाग, शासन निर्णय क्र. आरएलवाय-११०९/प्र.क्र.२४५/२००९/परि-५, दिनांक २५ जून, २०१५.
४) उप मुख्य अभियंता (बांधकाम), दक्षिण पूर्व मध्य रेल्वे, नागपूर यांचे पत्र क्र. DCE/C/१/NGP/Wadsa-Gadchiroli/१२१३, दिनांक १८.११.२०२१.

**प्रस्तावना :**

राज्यातील ग्रामीण विशेषत: अविकसित भागातील रेल्वे प्रकल्पांना गती मिळावी व लवकरात लवकर हे प्रकल्प पूर्ण व्हावेत, हा दृष्टिकोन समोर ठेऊन अशा प्रकल्पांमध्ये राज्य शासनाने काही प्रमाणात आर्थिक सहभाग देण्याचे धोरण स्विकारले आहे. त्यानुसार संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयाद्वारे वडसा-देसाईगंज-गडचिरोली या नवीन रेल्वे प्रकल्पास ५०% आर्थिक सहभाग देण्याचा निर्णय घेण्यात आला होता. दरम्यानच्या काळात विविध कारणास्तव प्रकल्पाच्या खर्चात वाढ झाल्याने रेल्वे मंत्रालयाच्या विनंतीनुसार सदर रेल्वे प्रकल्पाच्या रु.४६९.२७ कोटी (राज्य हिस्सा रु.२३४.६४ कोटी) खर्चाच्या सुधारित अंदाजपत्रकास संदर्भाधीन क्र.३ येथील शासन निर्णयाद्वारे राज्य शासनाची मान्यता देण्यात आली आहे. या प्रकल्पासाठी केंद्र शासनाने आतापर्यंत रु.४१.६२ कोटी खर्च केला असून सन २०२१-२२ या वर्षाकरिता रेल्वेने रु.१६.८२ कोटी इतकी तरतूद केली आहे. राज्य शासनाने आतापर्यंत संदर्भाधीन क्र.२ येथील शासन निर्णयाद्वारे रु.१० कोटी निधी वितरीत केला असल्याने रेल्वेने राज्य हिश्श्याची ५०% नुसार फरकाची रु.१९.२२ कोटी रक्कम अदा करण्याबाबत दिनांक १८.११.२०२१ रोजीच्या पत्रान्वये कळविले आहे. त्यानुसार वडसा-देसाईगंज-गडचिरोली या नवीन रेल्वेमार्गाकरीता रु.१९.२२ कोटी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

वित्तीय सल्लागार व मुख्य लेखाधिकारी (निर्माण), दक्षिण पूर्व मध्य रेल्वे, विलासपूर (Financial Adviser and Chief Accounts Officer (Construction), South East Central Railway, Bilaspur) यांना प्रस्तावनेत नमूद प्रयोजनासाठी रु.१९.२२ कोटी (एकोणीस कोटी बावीस लक्ष रुपये) इतकी रक्कम वितरीत करण्यास राज्य शासन या निर्णयाव्दारे मंजूरी देत आहे.

२. शासनाने उप सचिव/सह सचिव (अर्थसंकल्प), गृह विभाग यांना नियंत्रण अधिकारी व अवर सचिव/ कार्यासन अधिकारी, रोख शाखा, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२ यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित केले असून या शासन निर्णयाव्दारे त्यांना सदर रक्कम प्रदान करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे.

३. यासाठी येणारा खर्च सन २०२१-२२ या वर्षात मागणी क्र.बी-७, ३००१ भारतीय रेल्वे धोरण निश्चिती, संचालन, संशोधन व इतर संकीर्ण संघटना, ००, ८००-इतर खर्च, (००), (००) (०२)-रेल्वे प्रकल्पामध्ये राज्य शासनाचा सहभाग (३००१ ००५४), ३२-अंशदाने या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. महाराष्ट्र शासन, वित्त विभाग, शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २४ जून २०२१ व १४ ऑक्टोबर २०२१ सोबतच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद केल्याप्रमाणे सदर देयकांन्वये आहरीत करण्यात येणा-या रक्कमेचे स्वरुप “अंशदाने” या तपशीलवार शिर्षाखाली येते. त्यानुसार तपासणी करावयाच्या सुचीत नमूद केलेल्या सर्व अटी व शर्तीचे पालन करण्यात आले आहे.

५. प्रमाणित करण्यात येते की, शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २४ जून २०२१ व १४ ऑक्टोबर २०२१ सोबतच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ९ मधील क्रमांक १ ते १० मधील अटींची पूर्तता होत आहे.

६. सदर शासन निर्णय, नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१६३/१४६१, दिनांक १०.१२.२०२१ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.५४३/२०२१/व्यय-८, दिनांक २९.१२.२०२१ अन्वये देण्यात आलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०१२७१७१३४०२५२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

JAYSEN JAYPRAKASH INGOLE

Digitally signed by JAYSEN JAYPRAKASH INGOLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fac1868a3a3bc62404072a90fb604cfa54cc0c6b396bbe9f862cb814602e0bfd, pseudonym=92EF270887986A691552A8D64F666519350065AB, serialNumber=7C9E48AC69F313DEECCD6E9EECEEA57A822C9D8CCACD64DD1C5031B045E7C1F2, cn=JAYSEN JAYPRAKASH INGOLE
Date: 2022.01.27 17:14:25 +05'30'

**( जयसेन जयप्रकाश इंगोले )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) महालेखापाल, १ व २ (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई /नागपूर.

२) सचिव, केंद्रीय रेल्वे बोर्ड, रेल्वे मंत्रालय, रेल भवन, नवी दिल्ली.

३) महाव्यवस्थापक, दक्षिण पूर्व मध्य रेल्वे, विलासपूर.

४) वित्तीय सल्लागार व मुख्य लेखा अधिकारी, दक्षिण पूर्व मध्य रेल्वे, विलासपूर.

५) मुख्य अभियंता (बांधकाम), दक्षिण पूर्व मध्य रेल्वे, नागपूर

६) अधिदान व लेखा अधिकारी, नागपूर.

७) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, नागपूर.

८) अर्थसंकल्प-१, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.

९) वित्त विभाग (व्यय-८/अर्थ-११), मंत्रालय, मुंबई.

१०) नियोजन विभाग, कार्यासन १४६१, मंत्रालय, मुंबई.

११) रोख शाखा, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई यांना विनंती करण्यात येते की, सदर रक्कमेचा धनादेश Financial Adviser and Chief Accounts Officer (Construction), South East Central Railway, Bilaspur यांच्या नावाने काढण्यात यावा.

१२) निवड नस्ती, परिवहन-५.